पंचायत समिती, संग्रामपूर (जि. बुलढाणा) येथील नवीन प्रशासकीय इमारत बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

ग्राम विकास विभाग

शासन निर्णय क्रमांकः पंसई-२०२३/प्र.क्र.१७८/बांधकाम-०४

५ वा मजला, मर्झबान पथ, २५ बांधकाम भवन,

फोर्ट, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१

तारीख : १५ मार्च, २०२४

**वाचा :-**

१) **कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद, बुलढाणा यांचे पत्र क्रमांकः** बुजिप/बांवि/शाअई/८२४/२०२३, दिनांक ०७ जून, २०२३.

**प्रस्तावना :-**

मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बुलढाणा यांनी वाचा मधील अनुक्रमांक १ येथील पत्रान्वये पंचायत समिती, संग्रामपूर (जि. बुलढाणा) येथील नवीन प्रशासकीय इमारत बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती केली आहे.

०२. संग्रामपूर पंचायत समिती प्रशासकीय इमारत सन १९६२ मध्ये बांधण्यात आली आहे. सदर इमारत ही जीर्ण व धोकादायक झालेली आहे. सद्यस्थितीत प्रस्तुत इमारतीमध्ये एकुण ७८ अधिकारी / कर्मचारी इत्यादी पदे मंजुर असल्याने प्रशासकीय कामकाज करताना सदरील इमारत अपुरी पडत आहे. पंचायत समिती, संग्रामपूरच्या नवीन प्रशासकीय इमारतीचे बांधकाम गट क्र. १६० या क्षेत्रावर करण्यात येणार आहे. पंचायत समिती, संग्रामपूर इमारतीचे एकुण बांधकामाचे क्षेत्रफळ ९९५.१० चौ. मी. इतके प्रस्तावित केले आहे. कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद, बुलढाणा यांनी पंचायत समिती, संग्रामपूर नवीन प्रशासकीय इमारतीकरिता, मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांच्या नकाशावर आधारित, रू.५२४.०० लक्ष किंमतीचे अंदाजपत्रक सादर केलेले आहे. सदर अंदाजपत्रक सन २०२२-२३ च्या दरसूचीवर आधारित असून ते कार्यकारी अभियंता (बां.), जिल्हा परिषद, बुलढाणा यांनी साक्षांकित केलेले आहे. अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बुलढाणा यांनी प्रस्तावासोबत पंचायत समितीच्या ठरावाची प्रत, जागेचा उतारा, लीड चार्ट, क्वॅरी चार्ट, ले-आऊट प्लॅन, इत्यादी कागदपत्रे सादर केलेली आहेत.

**०३.** अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बुलढाणा यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या छाननी अंती, पंचायत समिती, संग्रामपूर (जि. बुलढाणा)) येथील नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाच्या रू.५२४.०० लक्ष इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

पंचायत समिती, संग्रामपूर (जि. बुलढाणा) येथील नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाच्या रूपये ०५,२४,००,०००/- (रूपये पाच कोटी चौवीस लक्ष फक्त) इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या कामांस पुढील अटींच्या अधीन राहून या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१. पंचायत समिती, संग्रामपूर (जि. बुलढाणा) येथील नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाच्या रू.५२४.०० लक्ष इतक्या किंमतीचे ढोबळ अंदाजपत्रक सादर केलेले आहे. तथापि, सन २०२२-२३ दरसूचीवर आधारित सविस्तर अंदाजपत्रक संबंधित मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग यांची मंजुरी घेणे बंधनकारक राहील.
२. पंचायत समिती, संग्रामपूर (जि. बुलढाणा) येथील नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाच्या आराखड्यास उपमुख्य वास्तुशास्त्रज्ञ, प्रादेशिक विभाग यांची मंजुरी घेणे बंधनकारक राहील.
३. प्रस्तुत बांधकामास तांत्रिक मान्यता देण्यापुर्वी संकल्पन तपासून घेणे आवश्यक राहील.
४. नियोजित नवीन प्रशासकीय इमारतीच्या बांधकामासाठी प्रस्तावित असलेली जागा जिल्हा परिषदेच्या नावावर असणे बंधनकारक राहील.
५. प्रस्तुत इमारतीचे बांधकाम विहित नमुना आराखड्यानुसार हाती घेण्यापूर्वी स्थानिक नगररचना प्राधिकरणाची तसचे अग्निशमन यंत्रणेची मंजुरी घेणे बंधनकारक राहील.
६. नियोजित आराखड्यात महिला पदाधिकाऱ्यासाठी प्रसाधनगृहासह विश्रांती कक्षाचे संकल्पन करण्यात येवून, सदर व्यवस्था इमारतीमध्ये निर्माण करण्यात यावी.
७. प्रस्तुत प्रशासकीय इमारत बांधकामामध्ये ग्रीन बिल्डींग संकल्पना अंमलात आणून, नैसर्गिक प्रकाशयोजना व वायुवीजन, पाण्याच्या व उर्जेच्या वापरात काटकसर, पर्जन्य जलपुनर्भरण आणि जास्तीत जास्त पर्यावरणपूरक बांधकाम साहित्य व साधन सामुग्रीचा वापर करणे आवश्यक राहील.
८. प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त तीन वर्षांत पूर्ण होईल, असे नियोजन करून, इमारत बांधकामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी दक्षता घ्यावी.

९. या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रशासकीय मान्यता किंमतीतच काम पूर्ण करण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध), जिल्हा परिषद यांनी दक्षता घ्यावी. प्रशासकीय मान्यतेपेक्षा अधिक खर्च झाल्यास तो संबंधित जिल्हा परिषदेने सोसावा,

१०.प्रस्तुत प्रशासकीय इमारतीमध्ये अपंगांना सोयी-सुविधा उपलब्ध होण्याच्या दृष्टीने रॅम्प, रेलींग व तत्सम सुविधा निर्माण करणे बंधनकारक राहील.

११.प्रत्यक्ष इमारतीचे बांधकाम करतेवेळी पर्यावरण विभाग क्र. ईएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/ता. क.१, दि. १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

१२.खरेदीशी संबंधीत बाबींकरिता ई निविदा प्रणालीचा अवलंब करून उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाकडील दिनांक २४/०८/२०१७ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या सूचना विचारात घ्याव्यात.

१३.स्थापत्य कामाच्या कालावधीतच विद्युतीकरणाबाबत तसेच इतर अनुषंगिक कामांचे योग्य नियोजन करून सदर कामे पुर्ण करावीत.

१४.सदर सविस्तर अंदाजपत्रकास मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, बुलढाणा यांचेकडून तांत्रिक मान्यता घेण्यात यावी.

०२. पंचायत समिती, संग्रामपूर (जि. बुलढाणा) येथील नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाच्या सविस्तर अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढीलप्रमाणे आहे.

| **General Abstract For Construction of Sangrampur P. S. Administrative Building Dist. Buldhana** | | | |
|---|---|---|---|
| **Sr. No.** | **Description of Item** | | **Cost (In Rs.)** |
| **A** | **Cost of work portion abstract B** | | 33090665.00 |
| | | **Total (C)** | **33090665.00** |
| | i) | Add for G. S. T. 18 % | 5956320.00 |
| | ii) | Add for S. Q. M. 0.5 % | 165453.00 |
| | iii) | Add for Insurance 1% | 330907.00 |
| | iv) | Add for labour insurance 1 % | 330907.00 |
| | v) | Add for Contingencies 4 % | 1323627.00 |
| | vi) | Add for external water supply & sanitation 8 % | 2647253.00 |
| | vii) | Add for Electrification internal 9 % | 2978160.00 |
| | viii) | Add for Furniture | 4963600.00 |
| | | **Sub Total (B)** | **18697227.00** |
| **B** | **Cost of Abstract C** | | **630256.00** |
| | | **Total Project Cost (A+B+C)** | **52418148.00** |
| | | **Says in Lakh** | **524.00** |

**०३.** प्रस्तुत कामाच्या सविस्तर अंदाजपत्रकास सक्षम प्राधिकाऱ्यांकडून त्वरेने तांत्रिक मान्यता घेऊन त्याची प्रत शासनास सादर करावी.

**०४.** उपरोक्त प्रशासकीय इमारत बांधकामासाठी संबधित सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर, अनुदान स्वरूपात निधी टप्प्या-टप्प्याने उपलब्ध करून दिला जाणार असून, तो

उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यात येईल. यावरील खर्च "२५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०३) जिल्हा परिषदांच्या इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५ ००५३)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**०५.** प्रस्तुतचा शासन निर्णय वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उप विभाग-पाच, अ.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१५१५४९४८०७२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRASHANT VINAYAKRAO PATIL

Digitally signed by PRASHANT VINAYAKRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9524CAB2D5A858B4A01FF72F5CAE5FDDC4F8C964F3AFC6B6249294AD88EC870D, cn=PRASHANT VINAYAKRAO PATIL
Date: 2024.03.15 20:32:32 +05'30'

**(प्रशांत पाटील)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. विधानसभा व विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई.
२. मा. मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
५. विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती.
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बुलढाणा.
७. महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
८. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, बुलढाणा.
९. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, बुलढाणा.
१०. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बुलढाणा.
११. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, बुलढाणा.
१२. कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद, बुलढाणा.
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा बुलढाणा.
१४. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, बुलढाणा.
१५. उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, अमरावती विभाग, अमरावती.
१६. जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, बुलढाणा.

१७. सभापती, पंचायत समिती, संग्रामपूर, जि. बुलढाणा.
१८. गट विकास अधिकारी, पंचायत समिती, संग्रामपूर, जि. बुलढाणा.
१९. निवडनस्ती, कार्यासन बांध-४, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.